**नक्षलवाद्यांना अटक करण्यासाठी त्यांच्याबाबत माहिती देणाऱ्या व्यक्तींना देण्यात येणाऱ्या रोख बक्षिसांच्या रकमेमध्ये वाढ...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एनएएक्स ०४१४/प्र.क्र.९२/वि.शा.१ ब**
सेंटर-१, ७ वा मजला, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई - ४०० ००५.
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०१४

वाचा :-

१) **शासन निर्णय गृह विभाग क्रमांक विशा-१(ब)एनएएक्स ०२८९/६३६, दिनांक २६.०५.१९८९**
२) **शासन निर्णय गृह विभाग क्रमांक विशा-१(ब)एनएएक्स ०२८९/६३६, दिनांक १६.०३.१९९०**
३) **शासन निर्णय गृह विभाग क्रमांक एनएएक्स २००५/प्र.क्र.२२/वि.शा.१ ब, दिनांक २४.११.२००६**
४) **अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमंस/२१-ए/१९५/ खबऱ्यांचे बक्षिस वाढ/७७/२०१२, दिनांक १५.०५.२०१४**

प्रस्तावना :-

गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर, नांदेड, यवतमाळ व भंडारा या जिल्ह्यांतील नक्षलवाद्यांविषयी माहिती देणाऱ्या व्यक्तींना रोख बक्षिसे देण्यासाठी दिनांक २४.११.२००६ च्या शासन निर्णयान्वये नियम अंमलात आणण्यात आले आहेत. खबऱ्याने नक्षलवाद्याची योग्य माहिती दिल्यास व त्या आधारे नक्षलवाद्यास अटक करण्यात आली किंवा ठार करण्यात आले तर संबंधित खबऱ्यास बक्षिसाची रक्कम देण्याबाबत आंध्र प्रदेश सरकारने आदेश निर्गमित केलेले आहेत. अशा प्रकारे बक्षीस जाहीर केल्याने तसेच संबंधित नक्षलवाद्यांच्या वैयक्तिक फोटोसह जाहीरनामा काढल्यास संबंधित नक्षलवाद्यांच्या उघड कृत्यास आळा बसण्यास मदत मिळते आणि सामान्य नागरिक बक्षीस मिळविण्याच्या उद्देशाने पोलीस दलाला माहिती पुरविण्यास पुढे येण्याची शक्यता वाढते असे आंध्रप्रदेशातील घडामोडींवरुन दिसून आले आहे. बातमीदार जिवाची जोखीम पत्करुन नक्षलवाद्यांच्या कारवायांसंबधी माहिती गोळा करीत असतात तसेच बातमीदारांच्या बक्षिसाच्या रकमेत वाढ केल्यास नक्षलवादी कारवायांसंदर्भात शासनास मदत करण्यास इतर लोकांनाही प्रोत्साहन मिळेल. सद्यःस्थितीत बातमीदारांना देण्यात येणारी बक्षिसाची रक्कम त्यांच्या जिवाच्या जोखमीच्या दृष्टीने खूपच कमी असल्याने बक्षिसाच्या रकमेत वाढ करणे आवश्यक आहे. सबब, सध्याच्या नक्षल हालचालीची तीव्रता आणि नक्षलवाद्यांच्या गुन्हेगारी प्रवृत्तीच्या मानाने तसेच संबंधित बातमीदारांच्या जीवाची जोखीम विचारात घेऊन दिनांक २४.११.२००६ च्या शासन निर्णयान्वये देय असलेल्या बक्षिसाच्या रकमेत वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर, नांदेड, यवतमाळ व भंडारा या जिल्ह्यांतील नक्षलवाद्यांविषयी माहिती देणाऱ्या व्यक्तींना खालीलप्रमाणे रोख बक्षिसे देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वर्गवारी विवरण | रक्कम (रु.) |
|---|---|---|
| १. | भा.क.पा. (माओवादी) ग्रुपचा जनरल सेक्रेटरी / P.B. सेक्रेटरी | १,००,००,०००/- |
| २. | पोलीट ब्युरो सदस्य/रिजीनल ब्युरो सचिव / सेंट्रल मिलिटरी कमिशन सचिव | ६०,००,०००/- |
| ३. | केंद्रीय कमिटी सदस्य /रिजीनल ब्युरो सदस्य / सेंट्रल मिलिटरी कमिशन सदस्य / सेंट्रल टेक्निकल टीम सचिव / गोल्डन कॉरिडोर समिती सचिव / स्पेशल झोनल कमिटी सचिव / स्टेट मिलिटरी कमिशन सचिव | ५०,००,०००/- |
| ४. | स्पेशल झोनल कमिटी सदस्य / स्टेट मिलिटरी कमिशन सदस्य / स्टेट कमिटी सदस्य / गोल्डन कॉरिडोर कमिटी सदस्य / रिजीनल मिलिटरी कमांड सचिव / स्टेट टेक्निकल टीम ग्रुप | २५,००,०००/- |
| ५. | डिव्हीजनल कमिटी सचिव / कंपनी दलम इनचार्ज / कंपनी दलम कमांडर, रिजीनल मिलिटरी कमांड सदस्य | २०,००,०००/- |
| ६. | डिव्हीजन कमिटी सदस्य /एरिया कमिटी सचिव / कंपनी दलम उप कमांडर | १६,००,०००/- |
| ७. | प्लाटून दलम कमांडर / कंपनी प्लाटून कमांडर | १२,००,०००/- |
| ८. | कंपनी प्लाटून उप कमांडर / प्लाटून दलम उप कमांडर | १०,००,०००/- |
| ९. | एलजीएस-एलओएस-सि.एन.एम. कमांडर / कंपनी व प्लाटून दलममधील सेक्शन कमांडर / ॲक्शन टीम कमांडर / डिव्हीजन स्टाफ टीम कमांडर | ८,००,०००/- |
| १०. | एलजीएस-एलओएस-सि.एन.एम. उप कमांडर/ कंपनी व प्लाटून मधील सेक्शन उप कमांडर / ॲक्शन टीम सदस्य / ए.सी.एम. | ६,००,०००/- |
| ११. | कंपनी दलम- प्लाटून दलम सदस्य / स्टेट टेक्निकल टीम सदस्य | ४,००,०००/- |
| १२. | एलजीएस/एलओएस/सि.एन.एम. /डिव्हीजन स्टाफ टीम सदस्य / अन्य पार्टी टीम / समितीचे सदस्य | २,००,०००/- |

सदर रकमा खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येतील :-

(अ) जर वरीलप्रमाणे दिलेल्या माहितीची परिणती संबंधित नक्षलवाद्यांना अटक करण्यात झाली नाही तर माहिती देणाऱ्या व्यक्तीस कसलेही बक्षिस देण्यात येऊ नये.

(ब) उपरोक्त बक्षिसांच्या रोख रकमा त्यात नमूद केलेल्या निकषाप्रमाणे पात्र अशा व्यक्तींना देण्यात याव्यात.

(क) उपरोक्त रकमा देय असणारी व्यक्ती शासकीय सेवक असेल व ती त्यात नमूद केलेल्या निकषाप्रमाणे बक्षिसाची रक्कम मिळण्यास पात्र असेल तर तिला अशासकीय व्यक्तीला अनुज्ञेय असलेल्या रोख रकमेच्या ५०% रोख रक्कम देण्यात यावी.

(I) वरीलप्रमाणे देय होणारी रु.२,००,०००/- च्या वरील परंतु रु.१०,००,०००/- पर्यंतची रक्कम मंजूर करण्याचे अधिकार संबंधित पोलीस अधिक्षकांना राहतील.

(II) वरीलप्रमाणे देय होणारी रु.१०,००,०००/- च्या वरील परंतु रु.२५,००,०००/- पर्यंतची रक्कम मंजूर करण्याचे अधिकार संबंधित पोलीस उपमहानिरीक्षक यांना राहतील.

(III) वरीलप्रमाणे देय होणारी रु.२५,००,०००/- च्या वरील परंतु रु.१,००,००,०००/- पर्यंतची रक्कम मंजूर करण्याचे अधिकार अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना राहतील.

३. सदर योजना ह्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होईल, पूर्वलक्षी प्रभावाने लागू असणार नाही.

४. यावरील खर्च "मागणी क्र.बी-१, लेखाशिर्ष २०५५-पोलीस-(००) ००१, संचालन व प्रशासन (००) (०१) पोलीस निरीक्षणालय-२० इतर प्रशासकीय खर्च (२०५५ ००१४)" या खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१८/१४/व्यय-७, दिनांक २३.०७.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०७१४४१०२३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: CN = Jayant Baliram Bhoir, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.08.08 16:25:50 +05'30'

**( जयंत भोईर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र राज्य

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री (गृह) / मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव

४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
६. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
७. सर्व विभागीय आयुक्त
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षल विरोधी अभियान, नागपूर
१२. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर
१३. सर्व पोलीस आयुक्त
१४. सर्व पोलीस अधिक्षक
१५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य १-२/लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७. सर्व कोषागार अधिकारी
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई
२०. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, गृह विभाग
२१. निवडनस्ती (वि.शा.१ ब)